शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अलिबाग या संस्थेसाठी आर. सी. एफ. वसाहतीमधील इमारती भाडेतत्वावर घेण्यासाठी तसेच, वीज व पाणी व इतर देखभाल दुरुस्तीच्या खर्चास तसेच आवश्यक ते करार करण्यास शासन मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जागाउ-०४२५/प्र.क्र.१४५/प्रशा-२
९ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग,
नविन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख : २० मे, २०२५.

वाचा :-

१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र.एमईडी-२०१०/प्र.क्र.७६(अ) /२०१०/शिक्षण-१, दिनांक ३१.०१.२०१२.
२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१९/प्र.क्र.१२/ भाग- १/२०१९/वैसेवा-२, दिनांक ०१.०२.२०२१.
३) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र. वैशिवि-२०२१/प्र.क्र.२३/ प्रशा-२, दिनांक २८.०४.२०२१.
४) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र. वैशिवि-२०२२/प्र.क्र.१८५/ प्रशा-२, दिनांक ०७.११.२०२२.
५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/भाडेपट्टी/ अ-४/२४८३/२०२५, दिनांक १९.०३.२०२५.

प्रस्तावना :-

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अलिबाग येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नीत ५०० रुग्णखाटांचे रुग्णालय सुरु करण्यास शासनाने संदर्भ क्र. १ वरील दिनांक ३१.०१.२०१२ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. या संस्थेकरीता जिल्हा सामान्य रुग्णालय, अलिबाग, जिल्हा रायगड या संस्थेतील जागा अपुरी असल्यामुळे राष्ट्रीय केमिकल्स ॲन्ड फर्टिलायझर्स (आर. सी. एफ.), थळ-अलिबाग या संस्थेच्या कुरुळ येथील वसाहतीतील जुनी शाळा (१२ खोल्या), टाईप “ए” रेसिडन्सी क्वार्टर्सच्या सहा इमारती (ए-०७, ए-०८, ए-१२, ए-१३, ए-१४, ए-१५- एकूण ७२ सदनिका) तसेच शाळेजवळची ६ एकर मोकळी जागा प्रती विद्यार्थी रु. २०००/- (प्रती सेमिस्टर) इतक्या भाड्याने ३ वर्षाकरीता घेण्याकरीता संदर्भ क्र. ३ वरील

शासन निर्णय दिनांक २८.०४.२०२१ अन्वये मान्यता प्रदान करण्यात आली होती. त्यानुसार आर. सी. एफ. व्यवस्थापन आणि संचालक, वैद्यकीय शिक्षण यांच्यामध्ये करार करण्यात आला होता. सदर कराराची मुदत माहे डिंसेबर २०२४ मध्ये संपुष्टात आलेली आहे.

द्वितीय वर्षासाठी प्रवेश घेतलेल्या विदयार्थ्यांना राहण्याची सोय तातडीने करण्याकरीता आर. सी. एफ. वसाहत, कुरुळ, ता. अलिबाग येथील इमारत क्र. ए-४४, ए-४५, ए-४६ (एकूण २७ सदनिका) विद्यार्थ्यांच्या वसतीगृहासाठी प्रती विद्यार्थी रु. २०००/- प्रती सेमिस्टर (शासकीय वसतीगृह शुल्क) इतक्या भाडयाने घेण्यात आलेल्या आहेत. तसेच वैद्यकीय महाविद्यालयाच्या प्रयोगशाळा व विभागांकरीता ए-१, ए-२ (२४ सदनिका) इमारतीमधील प्रती सदनिका रु. ७५४०/- व्यापारी दराने भाडेतत्वावर ३ वर्षाकरीता घेण्याकरीता संदर्भाधिन क्र. ४ वरील शासन निर्णय दिनांक ०७.११.२०२२ अन्वये मान्यता देण्यात आली होती. यास्तव, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अलिबाग या संस्थेकरिता आर. सी. एफ. वसाहतीमधील इमारती भाडेतत्वावर घेण्यासाठी तसेच, वीज व पाणी व इतर देखभाल दुरुस्तीच्या खर्चास तसेच आवश्यक ते करार करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

१. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अलिबाग या संस्थेकरिता पुढील ३ वर्षाकरीता करावयाच्या सामंजस्य कराराच्या अनुषंगाने सद्य:स्थितीत संस्थेसाठी उपलब्ध करुन दिलेल्या विद्यार्थ्यांच्या वसतीगृहासाठी वापरण्यात येणाऱ्या टाईप "ए" रेसिडेन्स व टाईप "बी" रेसिडेन्स क्वॉटर्सच्या एकूण १४ इमारती (एकूण १४३ सदनिका) याकरीता व शाळेसमोरील ६ एकर मोकळी जागा याकरीता प्रती विद्यार्थी प्रती सेमिस्टर रु. २५००/- प्रथम वर्षाकरीता व त्यापुढील कालावधीत प्रती वर्ष चक्रवाढ दराने १०% भाडेवाढीसह पुढील ३ वर्षाकरीता भाडेतत्वावर घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उर्वरीत ३ इमारती ज्यामध्ये ए-१, ए-२ व ए-१२ (एकूण ३६ सदनिका) व आर. सी. एफ. वसाहतीतील जुनी शाळा (१२ खोल्या) ज्यांचा वापर विविध शैक्षणिक विभाग व विद्यार्थ्यांच्या प्रशिक्षण आदिंकरीता करण्यात येत आहे. याकरिता सदर इमारती व जुनी शाळा यासाठी व्यवसायीक दर प्रती सदनिका रु. ८२९०/- प्रतीमहा प्रथम वर्षासाठी व त्यापुढील कालावधीत प्रती वर्ष १०% चक्रवाढ दराने

भाडेवाढीसह पुढील ३ वर्षासाठी घेण्यासाठी तसेच, वीज व पाणी व इतर देखभाल दुरुस्तीच्या खर्चास तसेच आवश्यक ते करार करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर खर्च संस्थेच्या १४ - भाडेपट्टी व कर या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

४. आर. सी. एफ. कडुन भाडेतत्वावर घेण्यात येणाऱ्या इमारतीमध्ये वापरण्यात येणाऱ्या वीजेची देयके प्रती युनिट रु. १३.१९ (जी.एस.टी. व इतर कर धरुन) या दराने व दरवर्षी एप्रिल महिन्यामध्ये सुधारित दराप्रमाणे वीज देयके अदा करणेसाठी प्रतीवर्षी रु. १६,०४,४००/- प्रमाणे इतका खर्च संस्थेच्या (०६) दुरध्वनी, वीज व पाणी या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -१, अनुक्रमांक-१० अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२०१२०७५८३२१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2025.05.20 13:37:47 +05'30'

**(म. गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रती,

१. महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अलिबाग, जि. रायगड.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड.
६. महाव्यवस्थापक,राष्ट्रीय केमिकल्स ॲन्ड फर्टिलायझर्स लि., अलिबाग, जि. रायगड.
७. निवडनस्ती (प्रशा-२).